**प्रशासकीय मान्यता**
राज्य योजनांतर्गत अतिरिक्त अनुदान मंजूर होण्याच्या अधीन राहून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे

**महाराष्ट्र शासन**
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : एसएचपी -२०२० /प्र.क्र. ३६ /प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : २७ मार्च २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/ प्र.क्र. ८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं / ससरुपु / एमआरआय/ रायो / अ. अनुदान /९३५ / १- म /२०२० , दिनांक २३.०१.२०२०
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन यांचे पत्र क्रमांक संवैशिवसं /ससरु / पेटसीआी /रायो/अ.अनुदान /२१७३/१-म /२०२०, दिनांक २८.०२.२०२०
६) शासन परिपत्रक, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक संकीर्ण २०२०/ प्र.क्र. १२९/ प्रशा-१, दिनांक २४.०३.२०२०

**शासन निर्णय :-**

विभागाच्या नियंत्रणाखालील ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे या संस्थेस विभागागास पुर्नर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध होण्याच्या अधीन राहून खालील तक्त्यात नमूद केलेली यंत्रसामुगी खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | किंमत (रुपये) | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | ३ टेस्ला एमआरआय | ०१ | १७,००,००,००० | १७,००,००,००० |
| २ | पेट सी.टी. विथ गामा कॅमेरा | १ | २८,००,००,००० | २८,००,००,००० |
| | | | **एकूण** | **४५,००,००,०००** |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनांतर्गत संबंधित लेखाशिर्षाखाली पुर्नविनियोजनाने निधी उपलब्ध होण्याच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणी करण्यासाठी पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केलेली आहे.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया “औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर / उपलब्ध होणाऱ्या अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केलेली यंत्रसामुग्री खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे
मागणी क्रमांक एस-४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा |
| (००) | - | राज्य योजनांतर्गत योजना |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यक महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे (४२१० १६२९) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |

**३.** सदर शासन निर्णय, उपरोक्त शासन परिपत्रक, दिनांक २४.०३.२०२० व शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३३०१३१९०७२३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.03.31 12:56:10 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
६. निवडनस्ती (प्रशा-१)